**शासकीय कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीच्या मंजूरी संदर्भात वैद्यकीय देखभाल नियम १९६१ व प्रचलित शासन निर्णयामध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राकायो-२०१८/प्र.क्र.२७४/राकावि-२

गोकूळदास तेपजाल रुग्णालय आवार,संकूल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक : २१ ऑगस्ट, २०१८

वाचा -

१) **सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/वैखप्र/ शाकर्मनियम समावेश/कक्ष-८ब/टे-१/प्र.क्र.७५८/१८, दिनांक १५.०१.२०१८.**

२) **इतिवृत्त क्रमांक बैठक-२०१७/प्र.क्र.२३५/२०१७/राकावि-२, दिनांक २५.०५.२०१७.**

प्रस्तावना -

शासकीय कर्मचाऱ्यांच्या वैद्यकीय खर्च प्रतिपुर्ती संदर्भातील वैद्यकीय देखभाल नियम १९६१ तसेच त्यासंदर्भातील वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयाचा आढावा घेवून त्यामध्ये वैद्यकीय देखभाल नियम १९६१ व शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्या संदर्भात प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

वैद्यकीय देखभाल नियम १९६१ तसेच त्यानुषंगाने वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयाचा आढावा घेऊन सद्य:स्थितीस अनुसरुन व भविष्याचा विचार करुन एक परिपुर्ण धोरण निश्चित करण्यासाठी पुढील प्रमाणे आढावा समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | सहसंचालक (रुग्णालये) राज्यस्तर, आरोग्य सेवा, मुंबई | अध्यक्ष |
| २) | उप सचिव (राकावि-२), सा.आ.वि.,मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३) | उप सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४) | जिल्हा शल्य चिकित्सक, ठाणे | सदस्य |
| ५) | वैद्यकीय अधीक्षक, सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई | सदस्य |
| ६) | उपसंचालक (रुग्णालये) राज्यस्तर, आरोग्य सेवा, मुंबई | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे असेल.

१) वैद्यकीय देखभाल नियम १९६१ चा आढावा घेऊन सद्य:स्थितीत उपलब्ध असलेल्या आरोग्य सेवांच्या अनुषंगाने सुधारीत नियमांचा मसुदा तयार करणे.

२) वैद्यकीय खर्च प्रतिपुर्ती संदर्भात सर्व शासन निर्णयांचे अवलोकन करुन त्यासंदर्भात सुधारणा/ठोस धोरण सुचविणे.

३) वैद्यकीय खर्च प्रतिपुर्ती संदर्भात खर्चाचा वाजवीपणा ठरविण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या (सीजीएचएस) तसेच इतर राज्यातील चांगल्या धोरणांचा अभ्यास करुन याबाबत सुधारणा सुचविणे.

४) शासन मान्य खाजगी रुग्णालय व इतर खाजगी रुग्णालय यातील फरक न ठेवता सीजीएचएस प्रमाणे दरपत्रकामध्ये सुसुत्रता आणण्याबाबत उपाययोजना सुचविणे.

५) शासकीय कर्मचाऱ्यास वैद्यकीय खर्च प्रतिपुर्ती मिळण्यास विलंब टाळण्यासाठी उपाय योजना सुचविणे.

६) आजाराची आकस्मिकता तसेच सदर आजार आकस्मिक /गंभीर स्वरुपाचा आहे, याबाबतच्या व्याख्या तयार करुन मार्गदर्शक सुचना सुचविणे.

७) शासन निर्णय १९ मार्च, २००५ मध्ये नमूद आजारांच्या प्रकारांच्या यादीमध्ये नवीन आजारांचा अंतर्भाव करण्याची आवश्यकता व त्याबाबतची कारणमीमांसा देऊन नवीन आजाराचा अंतर्भाव सुचविणे.

८) कॅशलेस वैद्यकीय सेवा, पोलीस व त्यांचे कुटुंबिय वैद्यकीय योजना अथवा वित्त विभागाच्या विमा छत्र योजनेच्या धर्तीवर शासकीय कर्मचाऱ्यांना लागू करण्याबाबत उपाययोजना सुचविणे.

९) शासकीय कर्मचारी/संघटना यांच्याकडून याबाबत आवश्यक ते अभिप्राय मागवून त्यानुषंगाने सुधारणा सुचविणे.

३. सदर समितीचा अंतिम अहवाल हा शासनास तीन महिन्याच्या आत सादर करणे बंधनकारक असेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२११११७०१८०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhise Govind Changoji

Digitally signed by Bhise Govind Changoji
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9596d652d5b6cb0f88e4c39c6c2adf97629debbf12176865f2683a6eb9318e8, cn=Bhise Govind Changoji
Date: 2018.08.21 11:40:40 +05'30'

**डॉ.गोविंद भिसे**

शासनाचे कार्यासन अधिकारी

प्रत,

१. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,

२. मा.मंत्री (आरोग्य), यांचे खाजगी सचिव,

३. मा.राज्यमंत्री (आरोग्य), यांचे खाजगी सचिव,
४. उप सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. उप सचिव (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई,
७. सहसंचालक, (रुग्णालये) राज्यस्तर, आरोग्य सेवा, मुंबई,
८. उपसंचालक, (रुग्णालये) राज्यस्तर, आरोग्य सेवा, मुंबई,
९. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, ठाणे,
१०. वैद्यकीय अधिक्षक, सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई,
११. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती (राकावि-२).